निवडणुकीसाठी नियुक्त करण्यात येणाऱ्या सहायक खर्च निरिक्षक यांच्यासाठी मानधनाचा समान दर निश्चित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सीईएल -२०१७/प्र.क्र. २११ /१७/३३**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ०३ एप्रिल, २०१७

**प्रस्तावना :**

भारत निवडणूक आयोगाने त्यांचे पत्र क्र. ४६४/ईसीआय/ एलईटी/एफयुएलसी/ ईईएम/ एईओ-एचओएन/२०१६/ईईपीएफ, दिनांक २९.१२.२०१६ अन्वये सहायक खर्च निरिक्षक यांच्या निवडणूक मानधनाच्या दरात समानता यावी यासाठी किमान रु. ७५००/- हा दर निश्चित केला असल्याचे कळविले आहे. सदरहू दर राज्यात नियुक्त करण्यात येणाऱ्या सहायक खर्च निरिक्षकांना लागू करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :-**

भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारीतील निवडणुकीसाठी, सहायक खर्च निरिक्षक जे गट “ब” दर्जाचे अधिकारी किंवा केंद्र शासनाच्या सेवेतील समकक्ष अधिकारी असतील अशा नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यांसाठी किमान मानधनाचा दर रु. ७५००/(रु.सात हजार पाचशे फक्त), निवडणुकीच्या कामासाठी पूर्णवेळाकरिता आणि कामाच्या काही भागासाठी त्या प्रमाणात, यानुसार निश्चित करण्यात येत आहे.

२. मानधनाचा सुधारित दर हा यापुढील निवडणुकीसाठी नियुक्ती करण्यात येणाऱ्या सहायक खर्च निरिक्षकांना लागू होईल.

३. उपरोक्त बाबींसाठीचा खर्च हा मागणी क्र. ए-२, २०१५ निवडणूका, या मुख्य लेखाशीर्षाखालील प्रकरणपरत्वे निवडणूकीचा प्रकार विचारात घेऊन केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५९/२०१७/व्यय-४ दिनांक २२.२.२०१७ व अनौपचारिक संदर्भ क्र. ८९/१७/सेवा-६ दि, १८.३.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०३३१११११८११९३०७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Nansing Valvi

Digitally signed by Anil Nansing Valvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a7c28200f6d58206324d8086ffcf99758c115aada508a7437f2ae5d9fa1ba5d, cn=Anil Nansing Valvi
Date: 2017.04.03 15:56:46 +05'30'

( अ. ना. वळवी )

उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी

महाराष्ट्र राज्य

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई

२) महालेखापाल (लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई /वांद्रे
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
५) विभागीय आयुक्त, कोकण विभाग/ पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/ नागपूर
६) जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी (सर्व)
७) उप जिल्हा निवडणूक अधिकारी, (सर्व)
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर (सर्व)
९) अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई-४०००३२
१०) निवड नस्ती.